# हा क्षण…

## विशाल इंगळे

ई साहित्य प्रतिष्ठान



हा क्षण (क्रमशः दीर्घकथा)

लेखक :- विशाल इंगळे

मोबाइल नंबर :- 7558362871

भ्रमणध्वनी क्र. - (+९१)७५५८३६२८७१

ई-मेल - vishalingle25793@gmail.com

पत्ता - १३३-१, शोभा नगर, शितल किराण्यामागे, पोस्ट- वि.एम.वि., तालुका/जिल्हा- अमरावती (४४४ ६०४)





# प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com

प्रकाशन :११ ऑक्टोबर २०१६ (दसरा)






## वाचकासाठी एक पत्र

प्रिय ________,

(ता.क. - माफ करा, आपलं नाव माहिती नसल्याने जागा रिकामी ठेवलीय. .. हि कथा आवडल्यास आपल्या नावाने रिकामी जागा भरायला विसरू नका. ..)

"हा क्षण" लिहून पूर्ण झाली ती टप्प्याटप्प्याने. .. पहिलं प्रकरण लिहिताना पुढच्या प्रकरणात काय लिहायचं हा विचार मी कधीही केला नाही. .. तरीही. .. तरीही सर्व जुळत गेलं. .. त्याला कारण म्हणजे "हि कथा काल्पनिक नाही!" हे हि असावं कदाचित. .. सिद्धार्थ, तन्मयी, आदित्य, ओमिका किंवा इतर पात्रांपैकी कुणीही असो, कुणी कुणी काल्पनिक नाही. .. हि सर्व पात्र माझ्यासोबतची. .. कळत-नकळत मला घडवण्यात या सर्वांचा अमूल्य वाटा आहे. .. माझ्या आयुष्यात आलेल्या प्रत्येक व्यक्तीने मला काहीतरी दिलंय. .. मी या सर्वांना बघत होतो. .. त्यांच्याकडून काही नं काही शिकत होतो. .. आणि त्यातूनच माझी बघण्याची दृष्टीही बदलत होती. .. या कथेतील प्रत्येक पात्र कुणाचं तरी प्रतिनिधित्व करतोय. .. कधी माझ्या मित्र-मैत्रिणींचं तर कधी माझ्या स्वतःचंच. .. "३ इडियट्स" मधला रँछो असो की "हा क्षण" मधला सिद्धार्थ, खऱ्या आयुष्यातही तो असतोच. .. या क्षणात जगा असा संदेश देणाराच नव्हे तर ज्यांच्या सहवासात आपण खरंच तो क्षण जगतो असा. .. माझ्या आयुष्यातही सिद्धार्थ



आला. .. एकदाच. .. एका क्षणासाठीच. .. तो आला आणि तो गेलाही, आला तसाच. .. पण आमच्या सर्वांचं आयुष्य बदलवून. .. तो परत कधी दिसला नाही, भेटलाही नाही. .. सिद्धार्थ जिथेही असेल त्याला कधीतरी हि कथा मिळेल, तो हि कथा वाचेल, प्रतिक्रिया देण्यासाठी म्हणून तरी तो परत भेटेल म्हणून "हा क्षण". ..

"हा क्षण" लिहून पूर्ण झालेली असली तरी आम्ही ती टप्प्याटप्प्याने प्रकाशित करण्याचा निर्णय घेतलेला आहे. .. वाचकांची पसंती आणि मिळालेला प्रतिसाद यावर "हा क्षण" चा पुढचा भाग आपल्यासमोर आणायचा कि नाही हे अवलंबून असेल. .. त्यामुळे आपल्या अमूल्य प्रतिक्रिया नक्की कळवा. .. मार्गदर्शनाची अभिलाषा. ..

"हा क्षण" लिहिण्यासाठी नेहमीच प्रोत्साहित करणाऱ्या आणि मला घडवण्यात मोलाचा वाटा असणाऱ्या माझ्या सर्व मित्र-मैत्रीणी (विशेषतः विपुल, श्वेता, राम, मंगेश, सायली, सुषमा, राहुल, अमर, पियूष, सुनिल आणि आशिष), माझ्या साहित्य प्रवासात असो किंवा खऱ्या आयुष्यात मला नेहमीच मार्गदर्शन करणाऱ्या आतिश दा, राहुल, सुनिलदा, चैताली, अस्वार गुरुजी इ. आणि माझ्यावर प्रथम संस्कार करणाऱ्या माझ्या आई-वडिलांनाच या कथेचं सर्व श्रेय जातं. ..

"हा क्षण" पुस्तक रुपात आपल्या पर्यंत पोहोचविण्यासाठी "ई-साहित्य"च्या टीमचा मी ऋणी आहे. ..

आणि शेवटी सर्वात महत्वाचे म्हणजे आपण. .. आपल्या अमूल्य प्रतिक्रिया व मार्गदर्शनाशिवाय या कथेला काहीही अर्थ नसेल. .. "हा क्षण" आपल्याही आयुष्यात



थोडा का हो ना बदल घडवून आणेल आणि आपल्याला नक्कीच आवडेल अशी आशा आहे. .. आणि नाही आवडली तरी तुमचं तसं पत्र वाचायला मला आवडेल. प्लीज. लिहाल ना?

लवकरच भेटू. .. हा क्षण (भाग २) सोबत. ..

कळावे. .. आभार. ..

आपलाच,

विशाल. ..

भ्रमणध्वनी क्र. - (+९१)७५५८३६२८७१

ई-मेल - vishalingle25793@gmail.com

पत्ता - १३३-१, शोभा नगर, शितल किराण्यामागे, पोस्ट- वि.एम.वि.,

तालुका/जिल्हा- अमरावती (४४४ ६०४)





विशाल

विशीच्या सुरुवातीलाच भन्नाट कविता आणि कथा लिहून आयुष्याला थेट भिडायला निघालेला विशाल इंगळे  सध्या पोस्ट ग्रॅज्युएशन करतोय. तेही  कंप्युटर एंजिनीरिंगमध्ये. आणि मराठी साहित्याचं प्रेम आणि कंप्युटरचं ज्ञान यांचा संयोग करून त्याने जून २०१४ मध्ये "मनापासून मनापर्यंत. ..!" या ई-अनियतकालिकेची सुरुवात केली. २०१५ मध्ये Marathi Poetry Slam ची सुरुवात केली या शिवाय त्याच्या प्रतिभेची झलक http://anamika-fromtheheart.blogspot.in या ब्लॉगवर मिळेलच.



---o अर्पण पत्रिका o---

खऱ्या आयुष्यातील "सिद्धार्थ" ला. ..

सप्रेम अर्पण

विशाल



सकाळी ५:०० चा अलार्म आज सुद्धा न चुकता वाजला... आदित्यला उठायचा कंटाळा आला होता, तरी ही तो उठला... ऑफिसमध्ये लेट पोहोचणे आदित्य अफोर्ड करू शकत नव्हता... तशी नोकरी त्याला हवी तशीच आणि इन-फ़ॅक्ट हव्या त्या कंपनीतच मिळाली होती... पण २४ तासांपैकी १२ तास सतत नॉन-स्टॉप काम करणं यामुळे त्याला स्वतःसाठी जगायला पण वेळ मिळत नव्हता... तन्मयी सोबत प्रत्यक्ष भेटीला आज जवळजवळ महीना झाला असेल... दोन वर्षाआधी आदित्यने "रेफ्लेक्शन्स" सॉफ्टवेयर कंपनी जॉइन केली आणि तेव्हापासून हे असंच चालतंय... तसं मगच्याच आठवड्यात आदित्यने तन्मयीला त्याच्या अपार्टमेंटमध्येच शिफ्ट



होण्यासाठी म्हंटलं होतं... त्यामुळे त्यांना कमीत कमी संध्याकाळ तरी सोबत घालवायला मिळणार होती... तन्मयीला शिफ्ट होण्यासाठी किमान एक आठवडा आणखी लागणार होता... कंपनी त्याला त्याची स्वप्ने पूर्ण होवू शकतील इतका पगार देत होती आणि केवळ या करिताच त्याने आतापर्यंत जॉब सोडला नसावा... पण ती स्वप्ने पूर्ण करण्यासाठी त्याच्याकडे वेळ मात्र नव्हता...

आदित्य बेडवरुन उठला... पावले वाशरूम कडे चालायला लागली... वाशरूमच्या भिंतीवरच्या आरशात बघत आदित्यने ब्रश करायला सुरुवात केली... त्याला आज डोकं थोडं भारी वाटायला लागलं... काहीतरी चुकचुकल्या सारखं वाटत होतं पण काही कळेना... वर्क स्ट्रेस असेल म्हणून त्याने मनातून विचार काढून टाकला... अंघोळ वगैरे करुन आदित्य बाहेर आला... ५:४५, कॉफीची वेळ... आदित्यचा किचनमध्ये प्रवेश... आदित्यने रेडिओ ऑन केला... कॉफ़ी करताना, संध्याकाळी स्वयंपाक करताना, घराची आवाराआवर किंवा इतर कामे करताना किंवा मग पुस्तक वाचताना आदित्यला रेडिओ ऐकण्याची सवय... आदित्यकडे टीवी आहे पण त्याला टीवी बघणं आवडत नाही... दिवसभरातल्या सर्व बातम्या असो की



मग जुनी गाणी तो रेडिओवरच ऐकणार... फक्त ब्राज़ील वर्सेस स्पेन ची फूटबॉल किंवा इंडिया-पाकिस्तानची क्रिकेट मैच याला अपवाद...

रेडिओवर कुण्यातरी मोठ्या लेखकांचा इंटरव्यू चालू होता... आपल्या आगामी पुस्तकबद्दल ते सांगत होते आणि आदित्यच्या कानावर ते शब्द आले,

"देव सगळ्यांना माफ करतो..."

आदित्य शून्यात हरवला...

"देव सगळ्यांना माफ़ करतोच रे, पण इथेही तुम्हाला कुणीतरी माफ़ करायला हवं...", सिद्धार्थ, आदित्य आणि तन्मयी सिद्धार्थच्या घरी टेरिसवर बसलेले... सिद्धार्थचं पहिलं पुस्तक प्रकाशित झालं आणि म्हणून सिद्धार्थने त्यांना सेलेब्रेट करायला म्हणून बोलावून घेतलं होतं... आदित्य आणि तन्मयी व्यतिरिक्त त्याचं कुणाचसोबत पटलं नाही... पार्टी म्हणजे फक्त पिज़्ज़ा आणि वाईन... त्यांची पार्टी



नेहमी अशीच व्हायची... हो, त्यानंतर जेवणाची व्यवस्थाही त्याने केली होती...

कुठल्यातरी विषयावर बोलता बोलता आदित्यच्या तोंडून निघालं,

"देव सर्वाना माफ करतो..."

"देव सर्वानाच माफ़ करतो रे, पण इथेही तुम्हाला कुणीतरी माफ़ करायला हवं... तुम्ही जेव्हा कुणाला तरी हर्ट करतो नं, तेव्हा त्यातून निर्माण होणारी दोषीपणाची भावना आयुष्य भर तुम्हाला टोचत राहते... जितकी हर्ट ती समोरची व्यक्ती असते नं त्यापेक्षा जास्त हर्ट तुम्ही स्वतःच होत असता... आणि ती व्यक्ती जर काही न बोलताच जर तुमच्या आयुष्यातून निघून...",सिद्धार्थ बोलता बोलता थांबला... डोळे पाणावलेले...

"तू बोलत का नाही तिच्यासोबत...? जर तुमच्या दोघांचीही लाइफ अफेक्ट होत असेल तर काय अर्थ आहे तुमच्या वेगळं होण्याला...? एकदा बोलून सॉर्ट ऑउट का करत नाहीस सगळं...?", तन्मयी...



"वेळ झालाय तन्मयी, खूप वेळ झालाय...", सिद्धार्थ...

गॅसवर ठेवलेल्या कॉफीच्या भांड्याला आदित्यचा हात लागला आणि चटक्याने आदित्य शून्यातून बाहेर आला...

आदित्यने कपाटातून मलम काढून हातावर लावला... आणि कॉफी-मग घेवून हॉलमध्ये सोफ्यावर येवून बसला...

इतक्यात डूअर बेल वाजली, आदित्यने दरवाजा उघडला...

कुणाचं तरी कूरियर आलं होतं... अदित्यने कूरियर घेतलं... कूरियर निनावी, पाठवणाऱ्याचं नाव नाही... आदित्यने घड्याळाकडे बघितलं... वेळ ६:१२... आदित्यने कूरियर कपाटात ठेवलं आणि आणि ऑफिसची तयारी चालू केली...



वेळ ८:०५... ८:१२च्या लोकलला वेळ होता... समोर एक मुलगी

पुस्तक वाचत बसली होती... "ओन्ली लव ईज़ रियल", सिद्धार्थचं फेवरेट बुक... सिद्धार्थ नेहमी म्हणायचा,

"माणसाने या क्षणी जगलं पाहिजे, बघ चालता चालता मला आता कुण्यातरी फोर व्हीलर ने उडवलं तर काय? मला हा क्षण जगायचाय... आयुष्यात नवीन दिवस आहे की नाही कुणाला माहिती? अगदी पुढच्या क्षणाची ही शाश्वती नाही... मग फ्यूचर सेक्युर करण्याला काय अर्थ आहे... मी उद्याचा विचार नाही करत... मला आत्ता जगायचंय..."

वेळ १०:४५... आदित्यला बॉस ने केबिनमध्ये बोलावून घेतलं...

"आदित्य, हे मिस्टर जॉन माइकल, हेड ऑफ 'इंटेलिजेंस प्राइवेट लिमिटेड'... आणि हे आमच्या कंपनीचे सी.इ.ओ. मिस्टर आदित्य विनायक..."



निदान अर्धा तास त्याचं कशावर तरी बोलणं झालं... आदित्य त्याच्या केबिनमध्ये परतला आणि पुन्हा कुठल्यातरी विचारात हरवला...

"ये, लोकं स्वतःला इंट्रोड्यूस करताना मी अमुक अमुक, टमुक टमुक पोस्टवर आहे असं इंट्रोडक्शन का देतात...?", सिद्धार्थच्या डोक्यात कधी, कसं, कुठे, काय येईल आणि त्याला कधी काय प्रश्न पडेल हे सांगता येत नाही... कॉलेजमध्ये कुण्या एका मोठ्या वक्त्याचं गेस्ट लेक्चर अरेंज करण्यात आलं होतं, वक्त्याच्या तोंडून इंट्रोडक्शन निघालं नाही आणि सिद्धार्थ चा प्रश्न निर्माण झाला...

"तुला काय प्रोब्लेम आहे त्याच्याशी?",आदित्य...

"अरे, म्हणजे बघ नं... तसं ही पोस्ट वगैरे सांगण्याची गरज काय? विचार करा... म्हणजे बघ, आपण कुणाला आपली ओळख करून देतो तेव्हा आपल्याला त्याच्याशी नातं तयार करायचं असतं, त्या व्यक्तीला जाणून घ्यायचं असतं... त्यात पोस्ट, फॅमिली बैकग्राउंड, इकोनोमिकल स्टेटस सांगायची गरज काय...



मी सिद्धार्थ राजपूत, मला लिहायला आवडतं... मी आदित्य, मला जग फिरायचंय, खुप खुप फिरायचंय... किंवा ही, मी तन्मयी, फोटोग्रॉफी हा माझा आवडीचा छंद... असं का इंट्रोड्यूस करत नाही... समोरच्या शिक्षकाला 'मी सिद्धार्थ, 63%...!' यावरुन विद्यार्थी कसा आहे, हे खरंच कळत असेल?",सिद्धार्थ...

अचानक फोनच्या रिंगने आदित्य पुन्हा भानावर आला...स्क्रीनवर तन्मयीचं नाव फ्लैश होत होतं... आदित्यने फोन उचलला...

"हं बोल?", आदित्य...

"अरे तुला बोलली होती न, मृणाल यू.एस. वरुन परत येणार होती पुढच्या आठवड्यात? तिचं तिकडलं काम लवकर संपलं आणि ती आजच परत आलीय तर उद्याच शिफ्ट होते तुझ्या अपार्टमेंटमध्ये... आणि राणी मावशीचा कॉल आला होता... तुला पार्सल पाठविलंय म्हणे कूरियर ने... तुझा कॉल लागत नव्हता म्हणून मला कॉल केला होता त्यांनी... पार्सल मिळालं का म्हणून...",तन्मयी...



"हे, एक मिनीट, सकाळी जे पार्सल आलं होतं ते राणी मावशी ने पाठविलं होतं? आज तारीख काय आहे...?"

"८ ऑगस्ट..."

"तन्मयी, ८ ऑगस्ट...! तरी सकाळ पासून काहीतरी चुकचूकल्या सारखं वाटत होतं..."

"अरे हो, मी पण कशी काय विसरली?"

"सोड, तू घरी ये... मी पण निघतो येथून... तिथून पार्सल घेवून निघू आपण... आपण जायलाच हवं... सिद्धार्थची शेवटची इच्छा होती... आपण जायलाच हवं... तिच्यापर्यंत पोहोचायलाच हवं ते पार्सल..."

* **



मुंबई-पुणे हाईवे... कार ची स्पीड, ताशी ८० किमी... आदित्यच्या हातात स्टेरिंग... डाव्या बाजूला तन्मयी... हातात पार्सल... अचानक आदित्य ने ब्रेक मारला... समोरून येणारी एक दूसरी फोर व्हीलर अगदी जवळून निघुन गेली... आदित्य ने ब्रेक मारण्यास अगदी एका क्षणाचा ही विलंब केला असता तर मोठा अपघात झाला असता... दूसरी फोर व्हीलर तशीच समोर निघुन गेली... आदित्य आणि तन्मयीने एक वेळ त्या फोर व्हीलर कडे बघितलं... ती दूसरी फोर व्हीलर नजरेआड़ झाली आणि आदित्यने स्टेरिंगवर डोकं ठेवलं... डोळे घट्ट मिटले... आणि कलर सिनेमांमध्ये जश्या ब्लैक एंड वाइट फ्लैशबैक दाखवतात तशी दृष्ये त्याच्या डोळयांसमोर फिरायला लागली...



"हट्ट ***... आदि, गाड़ी बाकी फार छान चालवतोस यार तू...

थोडक्यात वाचलो नाहीतर आज रात्री उर्वशी आणि मेनका सोबत नृत्य करायची संधी मिळाली असती...", सिद्धार्थ...

घाटांचा रस्ता... अचानक गाडीचा तोल जायला लागला... आदित्यने ब्रेक मारला... गाडी अगदी दरिपासून फक्त एका फूटाच्या अंतरावर येवून थांबली...

"ऐ चुप... जोक्स सुचतायेत याला... आणि माझी काहीच चुकी नाहीयेय यात... टायर पंक्चर झालाय बहुतेक...",आदित्य...

तिघेही फोर व्हीलर मधून खाली उतरले... टायर खरोखरच पंक्चर झालेला...

"या तन्मयीला ही बरंच सुचलं ईथे घाटांत फोटोग्राफी चं... हिच्या फोटोग्राफीच्या चक्करमध्ये माझी फोर व्हीलर गेली असती आज...",आदित्य...

"ये जीव वाचलाय त्याचं काही नाही, कार चं सुचतंय त्याला... आणि नेशनल लेवल फोटोग्राफी कॉन्टेस्ट आहे म्हंटलं, या पेक्षा चांगले फोटोग्राफ्स कुठे



येतील... आजुबाजुला बघ जरा...", तन्मयी...

"बाकी हे मला पटतंय तन्मयीचं... हे ठिकाण खुपच सुंदर आहे...", सिद्धार्थ स्टेफनी चेंज करता करता बोलला...

"अरे पण जीव गेला असता नं...?", आदित्य...

"अरे होतं असं कधी कधी... गाडीचा टायर पंक्चर झाला यात तिची काय चुकी आहे...", सिद्धार्थ...

"हो नं सिड? तसा पण गाड़ी तू चालवत होता, चूक तुझी आहे...",तन्मयी आदित्य कडे बघुन म्हणाली...

"ऐ चुप, तुमच्या दोघांनाही फक्त भांडायला कारण हवं असतं... कुणाचीच चूक नाहियेय यात... टायर चेंज केलाय, चला निघुया... आणि आता गाडी मी चालवणार...",सिद्धार्थ...

"म्हणजे उर्वशी सोबत नाचायचं पक्क झाल्यासारखं दिसतंय



तुझं?",आदित्य आणि तन्मयी बैकसीटवर बसले... सिद्धार्थने गाड़ी स्टार्ट केली...

"मी काय म्हणतोय, मी काहीतरी ठरवलय आताच... मी बाबांना सांगणारेय की मला इंजीनियरिंग नाही करायचीय... मला लेखकच व्हायचंय म्हणून...", सिद्धार्थ...

"काका नाही ऐकणार, तुला माहितेय... लेखन वगैरे सेफ प्रोफेशन नाही वाटत त्यांना... शिवाय तू दरवर्षी प्रथम येतो, तुला कुठल्याही मोठ्या कंपनीत जॉब मिळेल...", तन्मयी...

"समज आज आपली गाडी सरळ दरीत पडली असती तर? असं समजू नं की सिद्धार्थ राजपूत, आदित्य विनायक, तन्मयी महाजन दरीत पडून गेले... सिद्धार्थ, फ़क्त सिद्धार्थ... सिद्धार्थ, तन्मयी आणि आदित्यचा हा नवीन जन्म... आता तरी आपण आपल्या स्वप्नांसाठी जगायला हवं... फक्त विचार करायला आयुष्य खुप लहान आहे...", सिद्धार्थ...

"काका घराबाहेर काढतील तुला...!",तन्मयी...



"हम्म्म्म्म...", सिद्धार्थ दोन क्षण शांत...

"ये आदि, बाबाने घराबाहेर काढलं तर तुझ्या अपार्टमेंटमध्ये राहायला देशील नं काही दिवस?",सिद्धार्थ...

"काही पण काय विचारतोस सिड? ऑफकोर्स यार... पण मला माहितेय तशी वेळ येणार नाही...",आदित्य...

तन्मयीने आदित्यचे खांदे हलवले... आदित्य पुन्हा वर्तमानात... गाड़ी परत स्टार्ट झाली...

"हे मी ठरवलंय की मी जॉब सोडणारेय आता... आपल्या स्वप्नांसाठी आपल्याला वेळच मिळत नाही, हे जाणवतंय मला... मला कळतंय आता सिडला काय म्हणायचं होतं तर...",आदित्य...



मुंबई-पुणे हाईवे, वेग ताशी ८० किमी...!

तन्मयीने गाडीतला रेडिओ ऑन केला... आशा भोसले यांचं "कतरा कतरा" गाणं चालू होतं... तन्मयीने ख़िड़कीतून बाहेर डोकावून बघितलं... वाऱ्याची एक झुळुक तिच्या चेहऱ्यावरुन गेली... आणि तन्मयी भुतकाळात हरवली...

सिद्धार्थ, आदित्य आणि तन्मयी चौपाटिवर बसलेले... लाटांना निरखत... सिद्धार्थच्या म्यूजिक प्लेयरवर आशा भोसले चं गाणं, "कतरा कतरा"... आशा भोसले सिद्धार्थची फेवरेट गायिका... लता मंगेशकर मात्र त्याला बिलकुल आवडत नाही...



"मला वाटतं तू जायला हवं... तू इतकी मेहनत घेतलीस या कॉम्पेटिशन

साठी... तुझं स्वप्न आहे हे... तूला यात आंनद मिळतो आणि म्हणून तू जायलाच हवं...",सिद्धार्थ...

"अरे पण मग परिक्षेचं कसं?", तन्मयी...

"बघ तुझ्या सेफ करियर आणि स्वप्नांमधुन तुला एक चूज करायचंय... स्वप्नांना करियर करता येईल, करीयरला स्वप्न नाही करता येत... तुला ज्या गोष्टींतून आनंद मिळतो, तू तेच करायला हवं... माझं ऐकशील तर तुझ्या स्वप्नांतून अधिक सेफ करीयर निर्माण करशील तू स्वतःसाठी... हां, थोडा त्रास होईल पण... मला वाटतं तू जायला हवं तिथे...",सिद्धार्थ...

गाडी थांबली... तन्मयी भानावर...

"हे जर मी त्या दिवशी सिडचं ऐकलं नसतं तर? आज मी माझ्या स्वप्नांना आणि कदाचित स्वतःलाही हरवून बसले असते... थँक यू सिड...",तन्मयी...



आदित्यने तन्मयीच्या डोळयांत बघितलं... तिच्या डोळयांत पाणी... आदित्यने तिचे डोळे पुसले... थोडासा हसला... दोघेही गाडीतून उतरले... शे-दीडशे वर्षांआधीचा जूना वाडा, पण अजुनही भक्कम...

लग्नाची धावपळ चालू... सगळे घाईत...

दोघेही वाडयात शिरले... समोर "ओमिका" ची आई दिसली... त्या हातातलं काम टाकून दोघांकडे आल्या...

"नमस्कार काकू... ओमिका?",तन्मयी...

"तिच्या रूममध्ये आहे, मैत्रिणींसोबत... येताना त्रास नाही न झाला? तुम्ही भेटा तिला... मी तुमच्यासाठी चहा-पाण्याचं बघते..."

"कशाला काकू फॉर्मलिटीज...? चहा वगैरे नको...", आदित्य...

"हो नं... आम्ही तिला भेटतो आधी...", तन्मयी...

"अरे, दमला असाल... पाणी वगैरे तरी घ्याल नं... लांबच्या



प्रवासावरुन आलात... तुम्ही व्हा समोर, मी पाठविते कुणाला तरी...",काकू परत कामाला लागल्या, कुणाला तरी त्यांनी दोघांसाठी चहा आणि नाश्त्याचं बघायलाही सांगितलं, आदित्य आणि तन्मयी सरळ ओमिकाच्या रूमकडे चालायला लागले... छातीचे ठोके वाढत होते, डोक्यात विचारांनी काहुर माजलेला... दोघे ओमिकाच्या रूम पर्यंत पोहोचले... एकदा एकमेकांकडे बघितलं...

आणि मग हातातल्या पार्सलकडे...!

* **



रूम मधून ओमिका आणि तिच्या मैत्रिणींचा हसण्याचा आवाज येत होता... तन्मयीने दार ठोठावलं... आदित्यची अस्वस्थता आता वाढत होती... तन्मयीची ही तीच गत... कुणीतरी दार उघडलं... इतक्या लग्नाच्या गोंधळात ही त्यांना आतून कड़ी काढल्याचा आवाज स्पष्ट ऐकू आला... तन्मयीने आत पाऊल टाकलं... तिच्या पाठोपाठ आदित्य ने ही रुममध्ये प्रवेश केला... समोर ओमिका... तिच्या मैत्रिणी तिच्या हातांवर मेहंदी रंगवत होत्या... आदित्य आणि तन्मयीला समोर बघुन ओमिकाने मैत्रिणींना थांबायला सांगितलं आणि स्वतः त्यांची विचारपुस



करायला सुरुवात केली... ओमिकाच्या मैत्रिणी आधीपासूनच तन्मयी आणि आदित्याला ओळखत असाव्यात... ओमिका काही ही बोलली नाही तरी ही तिच्या मैत्रिणी रुममधून बाहेर गेल्या... जणू त्यांचं कुठल्या विषयावर संभाषण होणार हे त्यांनी हेरलं असावं...

काही वेळ ते प्रवास, करियर, मित्र-मैत्रिणी अश्या विषयांवर बोलत राहले... कॉलेजच्या आठवणी ही निघाल्या पण कुणीही सिद्धार्थ बद्दल बोललं नाही... काही वेळ असाच गेला... ओमिकाची लहान बहिण चहा आणि नाश्त्याचं घेवून आली...

"ओमिका, हे तुझ्यासाठी... सिड कडून...", शेवटी हिम्मत करुन आदित्य बोलला, पार्सल ओमिकाच्या हातात देत...

तिघांनीही एकमेकांकडे बघितलं... रुममध्ये शांतता... काही वेळ कुणीच काही बोललं नाही... ओमिकाची बहिण चहाचे खाली कप्स आणि नाश्त्याच्या प्लेट्स घेवून रूममधून बाहेर गेली...



"आणि तो...? तो नाही आला...? ??",ओमिका...

आदित्य आणि तन्मयीची नजर एक झाली...

क्लिक...

पुणे... सरस्वती सांस्कृतिक कॉलेज... एस. एस. सी. ... नाव वेगळं आणि वैशिष्ट्यही... फ़क्त सांस्कृतिक शिक्षण देणारं महाराष्ट्रातील पहिलं आणि एकमेव महाविद्यालय... तसं ते भारतातील पण असं पहिलंच कॉलेज होतं... या आधी अश्या पद्धतीचं शिक्षण देणारी महाविद्यालये फ़क्त विदेशांतच असायची... कुण्या एका महान नाटककाराने आपली आयुष्य भराची पूंजी घालवून पुण्यात हे महाविद्यालय उभारलं... सुरुवातीला फ़क्त सांस्कृतिक विषयांची आवड असणाऱ्यांनी इथे दाखले



घेतले... संख्या फ़क्त १५... लवकरच काही अभ्यासकांना या विषयांचं महत्त्व लक्षात आलं... त्यांनी ते इतरांच्या लक्षात आणून दिलं... दाखला घेणाऱ्यांची संख्या फ़क्त तीन वर्षांत दरवर्षी ३०० विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचली... तेव्हाच्या सांस्कृतिक मंत्र्यांनी या महाविद्यालयाला भेट दिली आणि भरभरुन प्रशंसा केली... महाविद्यालयाचं महत्व लक्षात घेवून सरकार कडून निधीही मंजूर झाला... वेगळा आणि स्वतंत्र अभ्यासक्रम, उच्च दर्जाचं शिक्षण यां मूळे महाविद्यालय लवकरच नावारुपास आलं... अनेक महान लेखक/कवी, नाटककार याच महाविद्यालयातून घडले... या महाविद्यालयातून शिक्षण घेणे लोकांना प्रतिष्ठेचं वाटायला लागलं...

दरवर्षी महाविद्यालयात स्टेट लेवल डिबेट कॉम्पेटिशन चं आयोजन व्हायचं... "ललित" या नावाने तो इवेंट जगप्रसिद्ध झाला... देशभरातून अनेक मराठी विद्यार्थी या कॉम्पेटिशनमध्ये भाग घेण्यासाठी उत्सुक असायचे...

सिद्धार्थला लेखक व्हायचं होतं... नेहमीच... अगदी लहानपणापासून...



केशवसुतांपासून नामदेव ढसाळ, शेक्सपीअर पासून चं. प्र. देशपांडे, पी. जी. वुडहाउस पासून चेतन भगत पर्यंत कितीतरी पुस्तके त्यानी वाचलेली... त्याचं सर्वात आवडीचं पुस्तक म्हणजे "लव इज रिअल"... त्याशिवाय मृगजळ, वपुर्ज़ा, दुनियादारी, मृत्युंजय, विंझोळ, रश्मिरथी ई. त्याची मोस्ट फेवोरेट बुक्स... आंबेडकर, व पु काळे, पु ल देशपांडे, प्रीती शिनॉय, यशवंत मनोहर, चैताली आहेर इ. त्याचे फेवरेट लेखक/कवी...

सिद्धार्थने काही लिहायला सुरुवात केली की तो फ़क्त लिहत राहायचा, सगळं वेळ-भान विसरून... सिद्धार्थ चं लेखनही अप्रतिम होतं... सगळं सोडून फ़क्त वाचत रहावं असं... ललित लेखनामध्ये त्याचा हात कुणीच पकडु शकलं नसतं... वपुंना तो नेहमी आपल्या आदर्शस्थानी मानायचा... सामाजिक विषयांवर त्याने काही लिहिलं की ते वाचून सरळ काळजात कट्यार घुसावी असंच असायचं... सिद्धार्थचं लेखन मात्र त्याचे बेस्ट फ्रेंड्स आदिती आणि तन्मयी, त्याची डायरी आणि काही मोजक्या इवेंट्स पर्यंतच मर्यादित राहलं... सिद्धार्थचे वडील आणि ताई दोघेही इंजीनिअर्स... सिद्धार्थने लेखक वगैरे होणं त्यांना मान्य नव्हतं... त्याने ही आपल्या



सारखं इंजीनियर वगैरेच व्हावं असं त्यांना वाटायचं... यात प्रतिष्ठेचा प्रश्न वगैरे नव्हता... तर चिंता होती आपल्या मुलाच्या भविष्याविषयी... लेखन वगैरे त्यांना कधीच सेफ करियर वाटलं नाही... पण एक दिवस आदित्यने त्याच्या वडिलांना कन्वीन्स केलंच... आदित्यच्या डायऱ्या कपाटातून बुकशेल्वसवर आल्या... फ़क्त आदित्य आणि तन्मयी साठी त्याने इंजीनियरिंग सोडली नाही, पण त्याला त्यात कधीच इंटरेस्ट नव्हता... आता जास्तीत जास्त वेळ तो आपल्या लिखाणाला द्यायला लागला... सिद्धार्थचं स्वप्न होतं एस.एस.सी. तुन शिक्षण घ्यायचं... आणि आता ते लवकरच पूर्णही होणार होतं... पण एस. एस. सी. त प्रवेश घेणं इतकं सोपी नव्हतं... त्या साठी एक विशिष्ट परिक्षा व्हायची... सिद्धार्थने ती परीक्षा नक्कीच क्लियर केली असती... पण एस. एस. सी.च्या प्रवेश परीक्षेची वयोमर्यादा होती १६-१८... सिद्धार्थचं वय २१... एस. एस. सी. त प्रवेश घेण्याचा आता फ़क्त एकच मार्ग उरला होता तो म्हणजे "ललित" स्पर्धा जिंकने... त्याकरिता वयोमर्यादा होती १६-२१... सिद्धार्थकडे ही शेवटची संधी होती...



तन्मयी, आदित्य आणि सिद्धार्थने एस. एस. सी. गाठलं... सहा राउंड्समध्ये विभागलेल्या या स्पर्धेचे शेवटचे दोन राउंड्स इथेच होणार होते... सिद्धार्थला आजपर्यंत वाद विवाद स्पर्धेत कुणीही हरवु शकलं नाही... प्रत्येक विषयावर त्याच्याकडे काही ना काही उत्तर असायचं... आणि तसं ही ही स्पर्धा जिंकणं त्याच्यासाठी अतिशय महत्वाचं होतं...

तिघांनी कॉलेजच्या आत प्रवेश केला... कॉलेज ची वास्तु, भिंतीवरील नक्षी, वाल पेंटिंग्स वगैरे बघुन आदित्य आणि तन्मयी पार भारावून गेले... त्यांच्या तोंडून शब्द ही निघेना... सिद्धार्थ, तन्मयी आणि आदित्य ऑडिटोरियमच्या दिशेने वळले... प्रचंड गर्दी... आतिफ असलमच्या कॉन्सर्टलाही आदित्यने इतकी गर्दी बघितली नसेल... ऑडिटोरियम खचाखच भरलेलं... जर्नलिस्ट आपले कैमेराज घेवून कार्यक्रम सुरु होण्याची वाट बघताना... आदित्यने घड्याळ बघितली... स्पर्धा सुरु व्हायला अर्धा तास अजून वेळ होता... मान्यवरांचं आगमन वगैरे झालं... सगळे जजेस् जगभरातले नावाजलेले साहित्यिक होते... बरोबर संध्याकाळी ७:३०ला स्पर्धा सुरु झाली...



राउंड ५... विषय - आपल्याला आयुष्याकडून नक्की काय हवंय...?

विषय वेळेवरच जाहीर करण्यात आला... तसा नियमच होता स्पर्धेचा... सिद्धार्थने युक्तिवाद मांडायला सुरुवात केली...

"...काय हवंय या बद्दल आपण नेहमीच कंफ्यूज असतो... आपल्याला नक्की काय हवंय या पेक्षा काय नकोय हेच सांगायला सोपं असतं... आयुष्याचंही काही अंशी तसंच असतं... नक्की काय हवंय हेच आपल्याला मांडता येत नाही... काय नकोय हेच आपण सांगत राहतो आणि मग कधीतरी आपणच आपल्याला नकोसे व्हायला लागतो..."

जवळपास ९ मिनिटे सिद्धार्थ बोलत होता...



सिद्धार्थने युक्तिवाद संपविला आणि टाळयांचा गडगडात झाला... सिद्धार्थच्या युक्तिवादासमोर समोरच्या विद्यार्थ्याचा युक्तिवाद कमी पडला आणि सिद्धार्थला फाइनलमध्ये एंट्री मिळाली...

फ़ाइनल राउंड... विषय - पुस्तक आणि आयुष्य...

फाइनल राउंड अर्थातच कठीण होणार होता... त्यातल्या त्यात फाइनल राउंड साठी काही विशेष नियम होते... राउंडचा वेळ होता फ़क्त ३ मिनिटे... आणि याच तीन मिनिटांत दोन्ही पक्षांना आपली मते मांडायची होती... एकमेकांचे युक्तिवाद खोडून काढायचे होते...



दरवर्षी प्रमाणे या वर्षी ही एस एस सी चीच एक विद्यार्थी फाइनलमध्ये

पोहोचली होती... ओमिका प्रजापती, नाव अनाउन्स झालं... ओमिका स्टेजवर आली... सिद्धार्थ तिच्याकडे फ़क्त बघतच राहला... तिच्या नजरेचा तो तिथेच शिकार झाला असावा... सिद्धार्थ राजपूत, आपल्या नावाची अनाउन्स ऐकून सिद्धार्थ भानावर आला... सिद्धार्थ स्टेजवर चढला पण त्याची नजर मात्र तिच्यावरुन हटली नाही... म्हणतात जगात प्रत्येक व्यक्तिसाठी देवाने कुणाला तरी बनवलंय, सोलमेट वगैरे म्हणतात नं असं कुणीतरी... त्या व्यक्तीला शोधायची गरज नसते... नियती स्वतःच त्यांची तुमच्याशी भेट घडवून आणते... कदाचित आपल्याला वाटू शकतं की ती व्यक्ती अनोळखी आहे म्हणून, पण हृदयाला हे नातं माहित असतं आणि हृदय कधीच चुकत नाही... कधी त्यांच्या स्पर्शाने असो की फ़क्त नजरेने आपल्याला ही हे नातं जाणवायला लागतं... सिद्धार्थ सोबतही असंच काहिसं झालं...

सर्वात आधी ओमिकाने युक्तिवाद मांडला...

"... पुस्तकी ज्ञान हे खरंच खऱ्या आयुष्यात उपयोगी येतं का...? खोटे



बोलू नये वगैरे मूल्ये आपण शाळेत, साने गुरूजी, महात्मा गांधी इ.च्या पुस्तकातुन शिकतो... पण खोटं बोलल्याशिवाय किती व्यवहार या जगात खरंच होतात? ५० रु. चं काम असलं तर २०० रु मागावे तेव्हा १०० रु देण्याचं आश्वासन मिळतं आणि प्रत्यक्षात मात्र ५०च मिळतात..."

"... खोटं बोलल्याशिवाय जगाचे बहुतेक व्यवहार चालत नाही, मान्य... पण ती मूल्ये त्यामुळे निरर्थक होत नाही... आणि त्यामुळे पुस्तकांचा आयुष्यात उपयोग होत नाहीच असा नाही... प्रत्येक गोष्टीला अपवाद असतो तसाच हा याला असणारा अपवाद मात्र आहे... चं प्र देशपांडे यांचं "तुमचं आमचं सेम असतं" हे नाटक वाचल्यावर स्त्री चं आयुष्य लग्नानंतर किती चेंज होतं ते शिकलो मी... शेक्सपिअर चं "अ मीड समर नाइट्स ड्रीम" शोकांतिका आहे की विनोदी नाटक? दुःखाला विनोदी पद्धतीने कसं मांडलं असेल त्याने...? सुख आणि दुःख दोन्ही ही एकाच नाण्याच्या दोन बाजु असतात, बघण्याच्या दृष्टिकोनातून फ़क्त फरक पडतो... पावसावरची तीच



कविता कुणी प्रेम कविता तर कुणी विरह कविता म्हणून बघतो तसं... हे शेक्सपिअरच्या त्या नाटकातुन शिकलो मी...", सिद्धार्थ...

ओमिका फ़क्त आश्चर्याने सिद्धार्थकड़े बघत होती... सिद्धार्थ थांबला... जजेस स्तब्ध... टाळयांचा गडगडात...

* **



"Set wide the window. Let me drink the day." - Edith Wharton

------------------------

काळे सर आणि त्यांची क्लासरूम... मला पडलेल्या अनेक कोडयांपैकी ही व्यक्ती एक कोडंच... साधारणतः तिशीतला, नेहमी चेहऱ्यावर हास्य असणारा, प्रत्येक गोष्टीत आणि प्रत्येक क्षणातही आनंद शोधणारी ही व्यक्ती... फॉर्मल जीन्स, काहीतरी इंस्पिरेशन कॉट असणारी प्लेन टी-शर्ट किंवा चेक्स चं शर्ट, डोळयावर काळया फ्रेम चा फायबर चा चष्मा, जीन्सच्या खिशालाला निळया आणि लाल रंगाचे पेन... खरं सांगायचं तर ही व्यक्ती मला शिक्षक वगैरे अजिबात वाटत नाही... कारण तो तसा वागतही नाही... कुणी पहिल्यांदा बघितलं तर वेड्यात काढावा अशी ही विक्षिप्त व्यक्ती... पण आयुष्य जगायचं कसं हे शिकविण्या साठी या व्यक्तीसारखा



शिक्षक भेटणे कठीण... काळे सर आणि त्यांची क्लासरूम... क्लासरूम? ?? छे...! एका इंग्लिश लिटरेचरच्या शिक्षकाची क्लासरूम कशी असावी? गार्डन...! महाविद्यालयाच्या भव्य परिसरातलं भलं मोठं तळं, त्याच्या अवतीभोवती फळा-फुलांची सुंदर बाग, तळयाच्या किनाऱ्यावरून संध्याकाळचा मावळतीचा सुंदर सूर्य दिसावा अशी बसण्यासाठीची छोटीशी जागा... कॉलेजच्या कॅन्टीन चा कट्टा असावा तशी गोलकार बसण्याची व्यवस्था... तळयाकिनारची हि जागा म्हणजे काळे सरांची क्लासरूम...!

बाकी सरांची शिकवणी एकदम भन्नाट... कुणीही आजपर्यंत या व्यक्तीचा एकही क्लास बुडविलेला नाही... ५ जून २०१६ चा तो दिवस... जागतिक पर्यावरण दिवस... गेल्याच आठवड्यातला... शनिवार... सकाळ चं सुंदर वातावरण, आजूबाजूला उमललेली सुंदर फुले, पक्ष्यांचा मधुर आवाज, दोन पावसानंतरची ती सुखावणारी सोनेरी माती... सगळं सगळं मला अजूनहि जसंच्या तसं लक्षात आहे... सकाळचे ५:३० वाजलेले... पहिल्या शिकवणीची वेळ... आम्ही सगळे मुख्य इमारतीपासून १०-१५ मिनिटांच्या अंतरावर असलेल्या आमच्या क्लासरूममध्ये



पोहोचलो... रस्ता पायदळी तुडवत... आम्ही म्हणजे सुरज, अमन, प्रिया, नीधी, सनम, आणि... आणि ओमिका... गुलाबासारखी कोमल, त्यासारखीच सुंदर, त्यासारखीच नाजूक, गुलाबाच्या पाकळयांसारखेच सुंदर ओठ, आणि त्यावर थांबलेल्या दवासारखे चकाकणारे डोळे... नक्षत्रांभोवती किनार ओढवी तसं डोळयांभोवती काजळ, नागीणीसारखी सळसळणारी तिच्या चेहऱ्यावरची बट... जगातल्या सगळया उपमा तिला दिल्या तरी कमीच पडतील कदाचित... तिला शब्दांत मांडणेच अशक्य... तांबड्या रंगाच्या सोनेरी नक्षीच्या साडीत अगदी गुलमोहरासारखी दिसत होती... ती माझ्याच जवळ येवून बसली... माझ्या हाताला तिच्या हातांचा स्पर्श झाला आणि उगाच मनात गुलमोहराचा गंध दरवळल्यासारखं झालं...

माझं ओमिकावर प्रेम तर नाही नं...? तिच्या सोबत असल्यावर मला स्वतःचंही भान राहत नाही... प्रत्येक क्षणी फक्त तिच्या सोबत राहावंसं वाटतं... ती सोबत असताना मी तिच्याच सारखा वागतो... का?



मिसेस सरपोतदार आल्या होत्या गेल्या आठवड्यात... माझ्यासाठी बर्थडे प्रेझेंट घेवून... मिसेस सरपोतदार दरवर्षी या दिवशी काही नं काही बर्थडे प्रेझेंट घेवून येतात... बर्थडे स्पॉइल करायला माझा... मला या बाईला भेटण्याची मुळीच इच्छा नाही हे कळत कसं नाही तिला...

२९ मे... माझा वाढदिवस... मस्त सिलेब्रेट करत होतो आम्ही... आदित्य आणि तन्मयी पण आलेले... भन्नाट मस्ती चालू होती... तेवढ्यात मिसेस सरपोतदारांचा उपहारगृह प्रवेश... मी सांगितलं त्यांना मला तुम्हाला भेटायची मुळीच इच्छा नाही, मला नेहमी भेटायचा प्रयत्न करत जाऊ नका म्हणून... आणि मी सरळ निघून आलो इकडे तळ्याकिनारी... एकटाच... पण जाता जाता मला मिसेस सरपोतदारांच्या डोळयांत पाणी दिसलं... नकळत माझे पण डोळे कधी भरून आले मला कळलंच नाही...



काय माहित किती वेळ बसलो असेल मी तिथे एकटाच... क्षितिजाच्या पल्याड जात भास्कराला निरोप देत बघत... नेहमी सोनेरी किरणांनी भरलेलं हे सुंदर वाटणारं आकाश आज मला मुळीच सुंदर वाटलं नाही... उलट हळूहळू वाढत जाणारा अंधार मला हवाहवासा वाटायला लागला... घराकडे परतणाऱ्या पक्ष्यांचा आवाज मला आज कर्कश वाटत होता... इतक्यात कुणाचा तरी हात माझ्या खांद्यावर पडला... मी वळून बघितलं... ती ओमिका होती... ह्या परिस्थितीतही तिच्या पांढऱ्याशुभ्र ड्रेसवरच्या गुलाबी नक्षीच्या किनारी आणि मॅचिंग इअररींग्स आणि ब्रॅसलेट कडे माझं लक्ष गेलंच... पलीकडे सूर्य मावळला होताच आणि इकडे चंद्र उगवला होता... ओमिका माझ्या शेजारी येवून बसली... तळयातल्या संथ पाण्याकडे आम्ही बघत होतो...



"तू असा का वागलास तुझ्या आई सोबत?", ओमिका शांत स्वरात

म्हणाली... तिची नजर अजूनही पाण्याकडेच होती... मी शांतच होतो... हळूच तिने माझ्याकडे बघितलं...

"तन्मयी आणि आदित्य ने सांगितलंय मला सगळं... तू असं वागायला नको होतं...", ओमिका...

"मग कसं वागायला हवं मी?", माझा आवाज आता शिथिल झाला होता पण माझ्या मनात अजूनहि मिसेस सरपोतदारांबद्दल राग होताच, " मी ३ वर्षांचा होतो, ताई ७ वर्षांची... सगळं व्यवस्थित होतं, कशाचीही कमी नव्हती, जेव्हा मिसेस सरपोतदार यांनी बाबांशी घटस्फोट घेतला आणि दुसरं लग्न केलं... आम्हाला एकटं सोडून..."

"कशाचीही कमी नव्हती...? नक्की? ?? हे तू अगदी विश्वासाने सांगू शकतोस?", ओमिका...



"म्हणजे?", मला ओमिकाचा रोख कळलाच नाही...

"शांततेने ऐकून घेशील माझं म्हणणं? म्हणजे फक्त ऐकून घे...! बघ पटलं तर..."

"हम्म्म..."

"माणूस सातत्याने प्रेमाच्या शोधात असतो... आणि दुर्दैवाने माणूस लग्न व्यवहारासारखा करतो... लग्न हा व्यवहार नाही... तडजोड हा प्रकार येथे लागू होत नाही... मग माणसाला ज्या गोष्टीची गरज असते, त्यालाच माणूस मुकतो... प्रेम... कधी कधी माणसाला हेच प्रेम दुसऱ्या व्यक्ती कडून मिळते... जगातील बहुतेक



घटस्फोटाचं हेच कारण असतं…!

तुझ्या आईने घटस्फोट घेतला पण तुम्हाला एकटं नाही सोडलं, नाहीतर तू निघून गेल्यावर त्यांचे डोळे कधीच भरून नसते आले… दरवर्षी न चुकताही तुला भेटायला म्हणून…", ओमिका दोन क्षण थांबली… माझ्याकडे बघितलं… "जगात आनंदी राहायचं असेल नं तर साधा सरळ नियम आहे सीड, 'ऍक्सेप्ट'…!"

ओमिकाचं मला सगळंच पटतं असं नाही… 'ऍक्सेप्ट'… सनम चं ब्रेकअप झालं तेव्हा पण तन्मयीने हेच वाक्य वापरलं होतं, "आपल्या घरात बघ अनेक वस्तू असतात… उदा. सोफा, दार वगैरे… त्या दारावरचे परदे, किंवा सोफ्यावरच्या चादरी पण बदलवत असतो आपण नेहमी… चादरी बदलवणे शक्य नसलं तर किमान सोफ्याची जागा तरी बदलवतो आपण… कारण माणूस हा बदलप्रिय प्राणी आहे… त्याला सातत्याने काहीतरी नवीन हवं असतं… आणि त्यासाठीच माणूस झगडत असतो… हि गोष्ट प्रेमात का लागू होऊ नये? जगात आनंदी राहायचं असेल नं तर



साधा सरळ नियम आहे, 'ऍक्सेप्ट'...!"

प्रत्येक सिच्युयेशनला 'ऍक्सेप्ट' करायचं? ??

असो... ५:३५... काळे सरांचा वर्गप्रवेश... २ फोर व्हिलर, आणि एक २ व्हिलर असूनहि हा व्यक्ती मुख्य इमारती पासून इथवर सायकल नेच येणार... आज सरांच्या प्लेन व्हाईट टी-शर्टवर,

"carpe diem

seize the day"

,असं ब्लॅक अँड रेड अक्षरात इंग्रजीत लिहिलेलं होतं... आजवरच्या अनुभवांतून आजचा विषय आमच्या लक्षात आला होता...



"गुड मॉर्निंग सर...", आम्ही सारे सोबतच म्हणालो...

"गुड मॉर्निंग... आज आपण लेक्चर राहू देऊ... त्यापेक्षा मी तुम्हाला एक गोष्ट सांगतो...", आम्ही सारे आश्चर्याने सर कडे बघत होतो,"मला आता येताना नं आज त्या पिंपळाच्या झाडावर दोन सुंदर सुतार पक्षी दिसले... तुमच्यापैकी कितींनी ते पक्षी बघितलेत...?"

आम्ही सारे शांत...

"कुणीच नाही? बरं जाऊ द्या... फार सुंदर आहेत ते पक्षी कुणाला बघायचे असतील तर बघून घ्या..."



"सर आतापर्यंत ते पक्षी तिथे राहले असतील का?", सूरज उवाच...

"बरोबर, मग तुम्ही पण येता येताच का नाही बघितलेत ते पक्षी...?"

"सर तुमचं लक्ष गेलं, सगळयांचंच कसं जाईल नं... आम्ही वर्गाचा विचार करत होतो येताना... आणि तेव्हा ते पक्षी असतील तिथेच कशावरून नं...", प्रिया...

"बरं मग काय काय बघितलंत तुम्ही? बाभळीला घरटं बांधणारी चिमणी, गुलाबाच्या फुलांवरचे दव, जास्वंदाच्या फुलावरची फुलपाखरे तरी?"



आम्ही सगळे गप्प...

"बघा, शिकवणीच्या विचारात तुम्ही हे सारं बघितलंच नाहीत... तुम्ही हे सारं सारं मिस केलं... आणि मी शिकवणी पण घेणार नाही आहे... मग आता?

रॉबर्ट हेररिक ची एक कविता आहे... त्याच्या सुरुवातीच्या काही ओळी आहेत... त्या अश्या...

Gather ye rose-buds while ye may;

Old Time is still a-flying;

And this same flower that smiles today,

Tomorrow will be dying.

काहितरी जास्त मिळविण्याच्या अपेक्षेत आपण बहुतेकदा आपल्याकडे जे आहे ते पण गमावून बसतो... जसं तुम्ही गमावलंय, फुलांचं उमलनं, फुलांचं हसणं,



पाकळ्यांवरचे दव... हे सारं नसेल पुढच्या क्षणी... उद्या कदाचित फुल पण नसेल... म्हणून एक म्हण आहे... इंग्रजीतली... 'stop and smell the roses'

थांबा... थांबा आणि अनुभवा या फुलांच्या गंधांना, या क्षणांना...

'take the cash and let the credit go'... पुढे काय होईल, काय मिळेल त्याचा विचार सोडा, या क्षणी जे जे आहे त्या क्षणांत जगा... दुरून डोंगर साजरे असं म्हणतात... 'the grass is always greener on the other side'... भविष्यात आपण ठरवू तसंच सगळं होत नसतं... म्हणून भविष्याचा विचार सोडा... या क्षणांतला आनंद घ्या... 'Better an egg today than a hen tomorrow'...

हेनरी डेव्हिड म्हणतो,

You must live in the present, launch yourself on every wave, find your eternity in each moment. Fools stand on their island



of opportunities and look toward another land.

There is no other land; there is no other life but this.

प्रत्येक क्षण सातत्याने भूतकाळात जमा होत आहे... हा क्षण परत येणार नाही...! प्रत्येक जाणारा क्षण आपल्याला एक एक पाऊल पुढे घेऊन जातोय, अंताकडे...!

कुण्यातरी जे. फर्निस चं एक वाक्य आहे, Never forget that you must die; that death will come sooner than you expect... God has written the letters of death upon your hands. In the inside of your hands you will see the letters M.M. It means "Memento Mori" - remember you must die.



वर्जिलच्या एका ओळीचा माझ्यावर फार प्रभाव आहे,

Death twitches my ear. 'Live,'he says, 'I am coming.'

म्हणून जगा, पुढचा विचार न करता जगा, या क्षणांत...

Dream as if you will live forever; Live as if you will die today.

'A simple definition of life: The chance'

मी इतकंच म्हणेल कि dont miss this chance...!



Don't be fooled by the calendar. There are only as many days in the year as you make use of...

कुठेतरी वाचलेली एक कविता ऐकवतो,

I looked after an old lady and she always used to say

'Three things never come back…

The spoken word, the sped arrow, and the neglected opportunity'

I look back on my life, yes I have regrets

Of the things I've done, or I haven't done



The things I’ve said or I haven’t said

We must remember, life is all too short

None of us know what is around the corner

So seize the moment and do it now

Grab every opportunity you can

Tell people around you that you love them

For tomorrow may never come…

Carpe Diem – seize the day..."

आम्ही सारे सरांकडे फक्त बघत होतो...



"चॅप्टर थ्री, टॉपिक नाईन्थ, पेज नंबर वन वन ऐट...! कार-पे डी-एम...!

एन्जॉय दी प्रेजेन्ट अँड डोन्ट वरी अबाऊट दी फ्युचर...

फाईन्ड आऊट अँड स्टडी मोअर अबाऊट दिज टॉपिक, अँड वी विल डिस्कस अबाऊट इट इन अवर नेक्स्ट लेक्चर...

आणि परत जाताना निसर्ग जे दाखवेल त्याचा आनंद घ्या, डोन्ट मिस इट...! थँक यु...! !!"



# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान मराठी साक्षरांमध्ये वाचनाची आवड निर्माण व्हावी आणि लेखक व कवींना एक सशक्त व्यासपीठ मिळावे या दुहेरी हेतूने स्थापन झाले. मराठीत एक जबरदस्त वाचन संस्कृती निर्माण व्हावी, तरुणांनी भरपूर वाचन करावे, ग्रामीण भागातील तरुणांना मोबाईलवर पुस्तके उपलब्ध व्हावीत, परदेशस्थ मराठी वाचकांना सहजासहजी इंटरनेटवर पुस्तके मिळावीत हे आमचे स्वप्न. जगातील चाळीस देशांतील सुमारे साडेतीन लाख वाचक या चळवळीचे सभासद आहेत. महाराष्ट्राच्या जवळपास प्रत्येक तालुक्यातील खेड्यापाड्यांत ई साहित्य चे वाचक आहेत. याशिवाय सुमारे वर्षाकाठी तीस ते चाळीस लाख वाचक ई साहित्यच्या वेब्साईटला भेट देऊन पुस्तके डाऊनलोड करतात. पण याने आमचे समाधान नाही. जोवर महाराष्ट्रातील प्रत्येक साक्षर हा वाचक होत नाही तोवर ही चळवळ चालेल. आमचे लक्ष्य सहा कोटींचे आहे. आमच्या पाठीशी माऊलींचा आशिर्वाद आहे. “ ईये मराठीचिये नगरी, ब्रह्मविद्येचा सुकाळू करी” ही त्यांची प्रार्थना आपणा सर्वांकरवी



सुफ़ळ संपूर्ण व्हावी.

आमच्या वाचकांना एकच विनंती. आपल्या ओळखीच्या किमान दहा साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला पाठवा. अशा रितीने आपण तीनाचे तीस आणि तिसाचे तिनशे होऊ. या मराठीचिये नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळू व्हायला वेळ नाही लागणार. सर्वांची साथ असेल तर.

एवढी विनंती मान्य कराच.

ई मेल पत्ते esahity@gmail. com या पत्त्यावर पाठवा बरं!



